**दिनांक ३१ ऑक्टोबर,२०१० हा "राष्ट्रीय संकल्प दिवस" म्हणून पाळण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
अल्पसंख्याक विकास विभाग
शासन परिपत्रक क्रमांकः अविवि-२०१०/प्र.क्र. १२४/का.८
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दि. २७ ऑक्टोबर,२०१०.

शासन परिपत्रक :-

१. स्व. इंदिरा गांधी यांचा पुण्यतिथी दिवस दि. ३१ ऑक्टोंबर, हा दरवर्षी "राष्ट्रीय संकल्प दिवस" म्हणून राज्यात यथोचितरित्या पाळला जातो. यावर्षी रविवार दि. ३१ ऑक्टोंबर,२०१० हा दिवस "राष्ट्रीय संकल्प दिवस" म्हणून पाळावयाचा निर्णय राज्य शासनाने घेतला आहे. हा दिवस खालीलप्रमाणे पाळण्यात यावा.

१) राज्याच्या, जिल्हयाच्या, तालुक्याच्या मुख्यालयात मेळावे (रॅलीज) राज्य / स्थानिक प्रशासनाने आयोजित करावेत.

२) सदर मेळाव्यामध्ये प्रामुख्याने राष्ट्रीय गीते, देशभक्तीपर गीते, संकल्पीय भाषणे इ. समावेश करावा. तसेच स्वर्गीय इंदिरा गांधी यांच्या भाषणातील उतारे वाचावे. त्याचप्रमाणे अशा कार्यक्रमामध्ये सर्व धर्माच्या लोकांच्या / सर्व राजकीय पक्षांचा सहभाग असावा.

२. सर्व विभागीय आयुक्त, सर्व जिल्हाधिकारी व तसेच सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी आपआपल्या कार्यक्षेत्रातील सर्व विभागांची व संबंधितांची मदत घेऊन सर्व कार्यक्रम यथोचितरित्या संपन्न करावा.

३. सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१०१०२७१६०८५६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-
( आ.शं.शेंडगे )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,

मा. राज्यपालांचे सचिव,
मा मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मा. मुख्यसचिवांचे सह सचिव,

प्रधान सचिव, महसूल व वन विभाग,
प्रधान सचिव, गृह विभाग, (गृह व समन्वय),
प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग,
प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग,
इतर सर्व प्रशासकिय विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
पोलिस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
पोलिस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
महासंचालक, माहिती जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई (प्रसिध्दीसाठी),
कक्ष अधिकारी, सा.प्र.वि./२९, (मंत्रालयातील कार्यक्रम आयोजित करण्याच्या आवश्यक त्या कार्यवाहीसाठी)
निवड नस्ती.